**शासन राबवित असलेल्या कल्याणकारी योजनांची विशेष प्रसिद्धी मोहिम.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र. ३२५/३४**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२
तारीखः २८ ऑगस्ट, २०१४

वाचा -

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, यांचे पत्र क्रमांक : प्रदर्शने का-६/ प्रसि.बा.मा.अ./२०१४ , दिनांक १९ ऑगस्ट, २०१४.

**शासन निर्णय-**

शासन राबवत असलेल्या विविध कल्याणकारी योजनांची माहिती समाजातील सर्व स्तरातील जनतेपर्यंत प्रभाविपणे पोहचविण्यासाठी, जाहिरात व दृक प्रसिद्धी माध्यमाद्वारे प्रसिद्धी करण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून राबविण्यात येणाऱ्या विशेष प्रसिद्धी मोहिमेच्या दुसऱ्या टप्प्यातील खाली नमूद प्रसिद्धीच्या बाबींसाठी येणाऱ्या रु. २०.०० कोटी (रुपये वीस कोटी फक्त) इतक्या खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रसिद्धीची बाब | तपशील |
|---|---|---|
| १ | वृत्तपत्रातील जाहिराती | शासनमान्य यादीतील अ,ब आणि क वर्गातील वृत्तपत्रांमधून अर्धेपान आकाराच्या (८०० चौ.सें.मी.) जाहिराती प्रसारित करणे. |
| २ | इलेक्ट्रॉनिक मिडियाद्वारे प्रसिद्धी | जाहिरातींची (जिंगल/स्पॉट) निर्मिती करणे आणि आकाशवाणी केंद्रे, विविध एफ.एम.वाहिन्या, दूरदर्शन, दूरचित्रवाणी वाहिन्या आणि चित्रपटगृहांतून तसेच जय महाराष्ट्र व दिलखुलास कार्यक्रमातून त्यांचे प्रसारण करणे |
| ३ | ॲडव्होर्टोरियल | |

२. उपरोक्त प्रसिद्धीच्या बाबींसाठी येणारा खर्च **रु. २०.०० कोटी (रुपये वीस कोटी फक्त)** सन २०१४ च्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर झालेल्या रु. ९३.२७ कोटी अनुदानातून, सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६-२२२०-माहिती व प्रसिध्दी, ६० इतर,१०१ जाहिरात व दृक प्रसिद्धी (००) (०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिद्धी मोहीम (योजनांतर्गत), २६ जाहिरात व प्रसिद्धी (संगणक सांकेतांक क्र.२२२०११७५) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

३. सदर खर्च करतांना शासनाचे निर्णय/परिपत्रक/वित्तीय नियमावलीतील तरतूदी इ. चे पालन करावे तसेच शासनाने विहित केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४५/१४४३, दिनांक २६ ऑगस्ट, २०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ८१८/१४/व्यय-४, दिनांक २८ ऑगस्ट, २०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२८१४१९३२७००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2014.08.28 14:16:23 +05'30'

**(रा.ना.मुसळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

२) महालेखापाल, (लेखापरीक्षण) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

३) उपसंचालक, (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

६) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग,(१४४३), मंत्रालय, मुंबई.

७) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-४/), मंत्रालय, मुंबई.

८) निवड धारिका /कार्यासन ३४